सन २०१६-१७ करिता वनीकरणाचा भरगच्च कार्यक्रम या योजनेअंतर्गत कोल्हापूर वनवृत्तांमधील पुर्व पावसाळी कामांचा चालू बाब प्रस्ताव. (४४०६०४९२)

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : एफडीएम-२०१६/प्र.क्र.१९२/फ-२**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,**
**दिनांक :- २० मार्च, २०१७**

**वाचा** :- १) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०.०४.२०१६.
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/नबाप्र/प्र.क्र.३७/(०४९२)/४०८/२०१६-१७, दि.३१.०५.२०१६.
३) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र.एफडीएम-२०१६/प्र.क्र.१९२/फ-२, दि.२८.०६.२०१६
४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/नबाप्र/प्र.क्र.३७/(०४९२)/२३६४/२०१६-१७, दि.१५.०३.२०१७.

**प्रस्तावना :-**

राज्य योजना सन २०१६-१७ करिता “सामूहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम (४४०६ ०४९२)” या योजनेकरिता रु.९५८०.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला होता. सदर अर्थसंकल्पित निधीच्या अनुषंगाने रु.९३२.७३ लक्ष इतकी रक्कम विविध वनवृत्तातील वनीकरणाची पुर्व पावसाळी कामे करण्याकरिता संदर्भ क्र.३ येथील दि.२८.०६.२०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये वितरित करण्यात आली होती. सदर शासन निर्णयान्वये वितरित करण्यात आलेल्या रक्कमेमध्ये कोल्हापूर वनवृत्तातील रु.१३८.६८ लक्ष रक्कमेच्या कामांचा समावेश होता.

२. कोल्हापूर वनवृत्तामधील प्रस्तावित करण्यात आलेली कामे ई-निविदा मागवून पूर्ण करण्यात आली. ई-निविदेमध्ये अंदाजपत्रकीय रक्कमेपेक्षा कमी रक्कमेची बोली लागल्यामुळे कोल्हापूर वनवृत्तामध्ये रु.१४.८५ लक्ष इतकी रक्कम शिल्लक राहत आहे. सदर शिल्लक रक्कमेच्या अनुषंगाने कोल्हापूर वनवृत्तामध्ये वनीकरणाची पुर्वपावसाळी कामे करण्याकरिता रु.१४.८५ लक्ष रक्कमेचा नवीन बाब प्रस्ताव अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी शासनास मान्यतेसाठी सादर केला असून सदर प्रस्तावाकरिता कोल्हापूर वनवृत्ताकडे शिल्लक असलेली रक्कम खर्च करण्यास मान्यता देण्याचे शासनाच्या विचाराधिन होते.

**शासन निर्णय :-**

३. सन २०१६-१७ या आर्थिक वर्षामध्ये “सामूहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम (४४०६ ०४९२)” या योजनेअंतर्गत कोल्हापूर वनवृत्तामधील वनीकरणाच्या पुर्वपावसाळी कामाकरिता रु.१३८.६८ लक्ष रक्कम वितरित करण्यात आली होती. परंतू, सदर कामे ई-निविदा मागवून पुर्ण करण्यात आली. ई-निविदेद्वारे सदर कामांकरिता कमी रक्कमेची बोली लागल्याने ४४०६०४९२ या संकेतांकाअंतर्गत कोल्हापूर वनवृत्ताकडे रु.१४.८५ लक्ष इतका निधी बचत झालेला आहे. त्यामुळे, सदर बचत झालेल्या निधीमधून कोल्हापूर वनवृत्तामध्ये आणखी ३० हेक्टर क्षेत्रावर वनीकरणाची पुर्वपावसाळी कामे करण्याकरिता अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व

विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी शासनास सादर केलेल्या प्रस्तावांतर्गत रु.१४.८५ लक्ष इतकी रक्कम खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर निधी या विभागाकडून मंजूर केलेल्या प्रस्तावातील क्षेत्र / कार्यक्रम / कामे यावरच खर्च होईल व कामाची द्विरुक्ती होणार नाही आणि मंजूर कामांव्यतिरिक्त कोणत्याही नवीन बाबीवर /नवीन क्षेत्रावर/ नवीन कामांवर खर्च करण्यात येणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच सदरहू निधी वितरित करण्यापूर्वी प्रस्तावानुसार योजनेतील निश्चित केलेल्या कामांना सक्षम अधिका-यांची तांत्रिक व प्रशासकीय मंजूरी असल्याची व त्याचबरोबर सध्या वाटप करण्यात येणा-या अनुदानातून खर्च करताना यामध्ये कोणतीही वित्तिय अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी. मागील वर्षी सदर योजनेकरिता वितरित केलेल्या निधीच्या विनयोगाबाबतचे प्रमाणपत्र सादर केले जाईल याची दक्षता घ्यावी. त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दि.२०.०४.२०१६, दि.१२.०८.२०१६ व दि.०८.०२.२०१७ रोजीच्या शासन परिपत्रकातील अटी व शर्तींची पूर्तता करण्यात येईल याची देखिल दक्षता घ्यावी.

५. सदर योजनेवर होणारा खर्च मागणी क्र.सी-१०, प्रधानशिर्ष ४४०६ - वनीकरण व वन्यजीवन या वरील भांडवली खर्च, १०१ वनसंरक्षण, विकास व पुनर्निर्मिती, (००)(०६) सामूहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम (४४०६ ०४९२) या लेखा शिर्षाखाली सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यांत यावा.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ वरील दि.२०.०४.२०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये आणि वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ भाग पहिला, उपविभाग-३, परिच्छेद २७ (२) अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२०१३००५४९२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

Dattatray Laxman Thorat

Digitally signed by Dattatray Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e99493394e30f531116ee97373b411b529e251aecc25fd9c455defa0031292a7, cn=Dattatray Laxman Thorat
Date: 2017.03.20 13:01:59 +05'30'

**(डी.एल.थोरात)**
सह सचिव, महसूल व वन विभाग

**प्रति :-** १) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), कोल्हापूर
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), १/२ महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
५) सह सचिव / उप सचिव, वित्त विभाग (अर्थ-३) / (व्यय-१०), मंत्रालय, मुंबई-३२.
६) उप सचिव, नियोजन विभाग (१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.
७) ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८) निवडनस्ती, फ-२ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.